उभारणीखालील प्रतिदिन १२५० मे.टन क्षमतेच्या कारखान्यांना रा.स.वि. निगमकडील उभारणी कर्ज राज्य शासनामार्फत वितरित करण्याबाबत.
शिवशक्ती सहकारी साखर कारखाना लि., कोळसूर, ता.उमरगा, जि.उस्मानाबाद.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांक : ससाका-२९०८ /प्र.क्र.७८/ ३-स
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ५ जुलै, २००८.
२) शासन पत्र समक्रमांक, दिनांक ९ फेब्रुवारी, २०१० व १० ऑक्टोंबर, २०११
३) रा.स.वि.निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक एनसीडीसी ९-४/२०००-शुगर/(१७१)/(एस ०८००८६), दिनांक १०/१०/२००८
४) केंद्र शासन, उपभोक्ता व्यवहार, अन्न धान्य व सार्वजनिक वितरण मंत्रालयाचे कार्यालयीन आदेश क्र. १९४० (ई), दिनांक १० नोव्हेंबर, २००६
५) रा.स.वि.निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. एनसीडीसी ९-४/२०००-शुगर (२७१)/आर.ए. १०२६३, दिनांक २७ ऑक्टोबर, २०११
६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९ ऑक्टोबर, २०१०
७) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २६ जुलै, २०१३

प्रस्तावना :-

दिनांक १२ जून, २००८ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीतील निर्णयानुसार उभारणीखालील प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमतेच्या शरद सहकारी साखर कारखाना म., औरंगाबाद, भाऊसाहेब बिराजदार सहकारी साखर कारखाना म., उस्मानाबाद, बाणगंगा सहकारी साखर कारखाना म., उस्मानाबाद, छत्रपती सहकारी साखर कारखाना म., बीड, संत कुर्मदास सहकारी साखर कारखाना म., सोलापूर, टोकाई सहकारी साखर कारखाना म., हिंगोली व शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., कोळसूर, ता.उमरगा, जि.उस्मानाबाद या ७ सहकारी साखर कारखान्यांना त्यांच्या आकृतिबंधात बदल न करता शासकीय भागभांडवलाचे प्रमाण पूर्वीइतकेच ठेऊन रु. २८.०० कोटीच्या मर्यादेत प्रत्येकी रु. १६.८० कोटी प्रमाणे कर्ज उभारण्याकरिता रु. ११७.६० कोटी कर्ज रुपाने रा.स.वि.निगमकडून घेऊन ते राज्य शासनामार्फत संबंधित साखर कारखान्यांना कर्ज

म्हणून उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., कोळसूर, ता.उमरगा, जि.उस्मानाबाद कारखान्याचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये रा.स.वि. निगमकडे पाठविण्यात आला होता. सदर प्रस्तावास रा.स.वि.निगमने दिनांक १०/१०/२००८ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. दिनांक २४/११/२००८ च्या पत्रान्वये शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., उस्मनाबाद या कारखान्यास २५ टक्के प्रमाणे रुपये ४.२० कोटी मुक्त केले आहेत. सदर निधी संबंधित सहकारी साखर कारखान्यास वितरीत करण्यात आला आहे. रा.स.वि.निममने आता दि. २७/१०/२०११ च्या पत्रान्वये शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., कोळसूर, जि.उस्मानाबाद या कारखान्यास ७५ टक्के प्रमाणे रु. १२.६० कोटी मुक्त केले आहेत. त्यानुसार सदर कारखान्यास रु. १२.६० कोटी पैकी रु. ९२५.०० लाख एवढे कर्जसहाय्य दि. २६/७/२०१३ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेले आहे. उर्वरित रु. ३३५.०० लाख एवढे कर्जसहाय्य सदर कारखान्यास मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., कोळसूर, जि.उस्मानाबाद या कारखान्यास उभारणीसाठी मंजूर केलेल्या कर्जसहाय्य रु. १६.८० कोटी पैकी रु. १२,६०,००,०००/- दिनांक २७/१०/२०११ च्या पत्रान्वये मुक्त केले आहे. रु. ९.२५ कोटी दि. २६ जुलै, २०१३ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले आहे. त्यानुसार सदर कारखान्यास देय असलेले उर्वरित कर्ज सहाय्य रुपये ३,३५,००,०००( रुपये तीन कोटी पस्तीस लाख फक्त ) मंजूर व वितरित करण्यास प्रशासकीय व आर्थिक मान्यता देण्यात येत आहे.

सदर मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

१) रा.स.वि. निगमाकडील दिनांक १०/१०/२००८ च्या पत्रासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अटी जशाच्या तशा लागू राहतील.

२) या प्रकरणी रा.स.वि. निगमकडील पत्र क्रमांक १-१/८४-बजेट, दिनांक १५/१०/८४ व क्रमांक एनसीडीसी १-१/९०/बजेट, दिनांक १४/११/२००८ मध्ये नमूद केलेल्या अटी जशाच्या तशा लागू राहतील. तसेच रा.स.वि.निगमामार्फत वेळोवेळी सुधारित करण्यात येणा-या अटी व शर्ती संबंधित कारखान्यावर बंधनकारक राहतील.

३) सदर कारखान्यास दि. २९/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये रु. ४.२० कोटी व दि. २६/७/२०१३ च्या शासन निर्णयान्वये रु. ९.२५ कोटी इतके रा.स.वि.नि.कडील कर्ज मंजूर करताना ज्या अटी नमूद करण्यात आलेल्या आहेत त्या जशाच्या तशा लागू राहतील. तसेच या अटींची पूर्तता कारखान्याने सहा महिन्यांच्या आत करणे बंधनकारक राहील.

४) या कर्जापोटी संबंधित कारखान्याने स्थावर व जंगम मालमत्तेचे गहाणखत शासनास करुन द्यावे. तसेच, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १५५ मधील तरतूदीनुसार सदर साखर कारखान्यांकडील शासनास देय असलेल्या सर्व रकमा जमिन महसूलाची थकबाकी वसूल करण्यासाठी त्यावेळी व जो कायदा व जे नियम अंमलात असतील, त्या कायदयानुसार व त्या नियमान्वये वसूली करण्यात यावी.

५) संदर्भ क्रमांक ४ येथे केंद्र शासनाच्या कार्यालयीन आदेशामधील अटीची पूर्तता केल्याशिवाय संबंधित साखर कारखान्यांना सदर रक्कम परत खात्यातून खर्च करता येणार नाही.

६) सदर रक्कमेचा विनियोग ज्या कारणासाठी सदर रक्कम मंजूर करण्यात येत आहे, त्याच कारणासाठी खर्च करण्याबाबत साखर आयुक्तांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

२. उपरोक्त बाबीवरील होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक व्ही-५,

६४२५- सहकारासाठी कर्जे,

१०८- इतर सहकारी संस्थांना कर्जे,सहकारी साखर कारखाने-

(०३) (०५) सहकारी साखर कारखान्यांच्या आधुनिकरणासाठी व

विस्तारीकरणासाठी कर्जे

( रा.स.वि.निगम (६४२५ ०६०९)

५५ कर्जे व आगाऊ रकमा

३. कर्जसहाय्यापोटी मंजूर करण्यात आलेल्या **रुपये ३,३५,००,०००/ (रुपये तीन कोटी पस्तीस लाख फक्त )** इतक्या रकमेचे आहरण करुन वितरित करण्याकरिता लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाव्दारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच, साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यास

अनुसरुन आहरण व संवितरण अधिकारी यांनी उपरोक्त रक्कम आहरण करुन सदर रकमेचा धनादेश खालील सहकारी साखर कारखान्याच्या नावे त्यांच्यासमोर दर्शविलेल्या रक्कमेप्रमाणे काढण्यात यावा.

| अ.क्र. | कारखान्याचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| १ | शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., कोळसूर, जि.उस्मानाबाद<br>Shivshakti Sahakari Sakhar Karkhana Ltd. Kolsur, Dist.Osmanabad | ३,३५,००,०००/-<br>3,35,00,000/- |
| | **एकूण** | **३,३५,००,०००/-** |

४. या प्रकरणी साखर आयुक्त यांनी कारखान्याकडून स्थावर व जंगम मालमत्तेचे गहाणखत शासनाच्या नावे करुन घ्यावे. तसेच लोन ॲग्रीमेंटही संबंधित कारखान्याकडून करुन घ्यावे. उपरोक्त रक्कमेचा विनियोग कारखाना आवश्यक त्या बाबीकरीताच करीत आहे या बाबीचे नियंत्रण संबंधित बँकामार्फत साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यानी ठेवावे व या बाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा. सदर रकमेचा विनियोग दाखला साखर आयुक्तालयामार्फत शासनास सादर करण्यात यावा.

५. सदर कर्जाच्या परतफेडीच्या मुद्दल व व्याजाची रक्कम खालील लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी:-

**मुद्दल-**

मागणी क्रमांक व्ही-५,

६४२५ - सहकारासाठी कर्जे,

१०८- इतर सहकारी संस्थांना कर्जे,

(१०) सहकारी साखर कारखान्यांच्या आधुनिकीकरण व विस्तारीकरणासाठी कर्जे

(रा.स.वि.निगम पुरस्कृत)

५५-कर्जे व आगाऊ रकमा (६४२५५४७८)

**व्याज-**

मुख्य लेखाशीर्ष, ००४९- व्याजाच्य जमा रकमा

१९५, सहकारी संस्थांकडून व्याज

(०१) (०९) सहकारी साखर कारखाने (००४९१२०१)

वरीलप्रमाणे कर्ज व व्याजाची रक्कम विहित मुदतीत जमा केल्याचे चलन संबंधित साखर कारखान्याने साखर आयुक्तालयामार्फत शासनास जमा करावे.

६. या बाबीसाठी सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पात एकूण रुपये ३३५.०० लाख ( रुपये तीनशे पस्तीस लाख फक्त ) एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर खर्च झाल्यानंतर या लेखाशिर्षाखाली तरतूद शिल्लक राहणार नाही.

७. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१२/२०१५ /व्यय-२, दिनांक ३१/३/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३११९३१३०१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Balasaheb Ishwar Sawant

Digitally signed by Balasaheb Ishwar Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Balasaheb Ishwar Sawant
Date: 2015.04.04 12:39:22 +05'30'

**( बा.ई.सावंत )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई/नागपूर.

२) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई/नागपूर

३) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

४) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

६) सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मादाम काम रोड, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.

७) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३ व १३)

८) कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (१७स/२१स)

९) वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

१०) संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ४, सिरी इन्स्टिटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली ११०००१

११) प्रादेशिक उप संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगमं, ५-बी.जे.रोडे, पुणे

१२) कार्यकारी संचालक, शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., कोळसूर, ता.उमरगा, जि.उस्मानाबाद

१३) प्रादेशिक सहसंचालक (साखर), नांदेड, भूविकास बँक इमारत, आयटीआय कॉलेजसमोर, नांदेड

१४) विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१ (साखर), उस्मानाबाद

१५) निवड नस्ती, कार्यासन -३